**महाराष्ट्र शासन,**
**गृहविभाग ( परिवहन व राज्य उत्पादन शुल्क)**
**मंत्रालय, मुंबई**

क्रमांक: बीपीए १०९८/८/इएक्ससी-२ दिनांक:१३ नोव्हेंबर ,२००१

## परिपत्रक

अधिनियम

शासनाने मुंबई दारुबंदी/कायदा १९४९ च्या कलम २ (२८) अंतर्गत सन २०००चा महाराष्ट्र अधिनियम क्र.३५ दि.५ ऑगस्ट २००० अन्वये सुधारणा केली असुन त्यानुसार मळीच्या व्याख्येत अखाद्य गुळाचा आंतर्भाव करण्यात आला असुन शासन अधिसूचना गृह विभाग क्रमांक बीपीए.१०९८/८/इएक्ससी-२ दिनांक १६.१०.२००१ अन्वये उपरोक्त अधिनियम दि.१६.११.२००१पासुन अंमलात येईल. सदर दुरुस्ती मुळे कलम क्रमांक २(२८) अंतर्गत मळीची व्याख्या स्पष्ट व अधिक व्यापक करण्यात आली आहे की जेणेकरुन सदर अधिनियमामध्ये नमुद केल्या प्रमाणे असणारा अखाद्य / काळा गुळ किंवा इतर नावाने संबोधण्यात येणाऱ्या पदार्थांचा समावेश सदर व्याख्येमध्ये करण्यात आलेला आहे.

२. अधिनियमाच्या अंमलबजावणीकरीता मार्गदर्शनात्मक सूचना निर्गमित करण्याची गरज आहे. यासंदर्भात राज्यातील शेतकरी व व्यापारी संघटनांनी अशी भीती व्यक्त केली आहे की कायद्यातील उपरोक्त दुरुस्तीमुळे खाण्यायोग्य गुळाचा व्यापार / निर्मिती करणा-या व्यापाऱ्यांना व शेतक-यांना विनाकारण त्रास होण्याची शक्यता आहे. जसे की एखाद्याकडे चांगला गुळ असेल व तो कालोघात, साठवणुकीमध्ये उष्ण हवामानामुळे, दमट हवामान, पावसाळयामध्ये त्यावर पाणी ठिबकणे वगैरेमुळे काळा/लालसर काळा/ पातळ असा होऊ शकेल. कायद्यातील उपरोक्त दुरुस्तीनुसार तो मळीच्या व्याख्येमध्ये मोडला जाईल व त्यामुळे ज्यांचा काही गुन्हा करण्याचा उद्देश नव्हता अशा निरापराध असलेल्या व्यक्तींना अटक केली जाईल व त्यांच्या विरुध्द गुन्हा नोंदविला जाईल. व्यापा-यांनी अशीही भिती

व्यक्त केली आहे की, त्यांनी खरेदी केलेला गुळ नियमात बसत आहे की नाही अशी माहिती राहणार नाही. संघटनेने अशी अडचण व्यक्ती केली आहे की कायद्यातील दुरुस्ती मुळे व्यापारी तथा (गु-हाळे चालविणा-या) शेतकरी वर्गास मुंबई दारुबंदी कायद्या अंतर्गत विहीत केलेल्या अनुज्ञप्ती मोठ्या प्रमाणावर घ्याव्या लागतील. तसेच विश्लेषण अहवाल प्राप्त होण्यास लागणाऱ्या विलंबामुळे चांगला गुळ विनाकारण दीर्घ काळ अडकवून ठेवला जाईल. सदर अधिनियमाची अंमलबजावणीकरीता नाहक त्रास होऊ नये व ग्रामीण भागाच्या अर्थव्यवस्थेवर परिणाम होऊ नये अशीच शासनाची भूमिका आहे.

कार्यवाहीसाठी समितीची नियुक्ती

३. या अधिनियमाची प्रभावी अंमलबजावणी करण्याकरीता व या संदर्भात उद्‌भवणाऱ्या सर्व बाबींसंदर्भात कार्यवाही करण्यासाठी प्रत्येक जिल्हयात जिल्हा स्तरावर जिल्हाधिकाऱ्यांच्या अध्यक्षतेखाली पुढीलप्रमाणे सदस्य असणारी समिती नियुक्त करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २) | पोलीस विभागाचे उप आयुक्त / अधीक्षक दर्जाचे अधिकारी | सदस्य |
| ३) | मर्चंट असोशिएशनचे त्या जिल्हयातील अध्यक्ष / सचिव किंवा इतर संघटनेचे जिल्हाधिकारी नेमतील ते प्रतिनिधी | सदस्य |
| ४) | सभापती / सचिव जिल्हा कृषी उत्पादन बाजार समिती | सदस्य |
| ५) | अधीक्षक राज्य उत्पादन शुल्क | सदस्य सचिव |

४(१) ज्याअर्थी उपरोक्त अधिसूचनेद्वारे लागु केलेले मळीबाबतचे नियम खाद्य गुळास ~~गुळास~~ लागू रहाणार नाहीत. म्हणून पुढील आदेश होईपर्यंत खालील बाबतीत अनुज्ञप्ती घ्यावी लागणार नाही

(२) राज्यातील शेतकऱ्यांच्या गुऱ्हाळात उत्पादित होणाऱ्या गुळाबाबत. सदर गुळाची कृषी उत्पन्न बाजारसमिती मार्फत विक्री करताना सदर गुळ खाण्यास योग्य असल्याचा दाखला सादर करावा लागणार नाही.

(३) राज्यात उत्पादित होणाऱ्या व कृषी उत्पन्न बाजार समिती मार्फत खरेदी / विक्री होणाऱ्या गुळाबाबत. कृषी उत्पन्न बाजार समितीने गुळ राज्यात उत्पादित झाला असल्याबाबत आवश्यकतेनुसार खात्री करुन घ्यावी

(४) कृषी उत्पन्न बाजार समितीमार्फत खरेदी केलेल्या व पुर्नविक्री / वापर वगैरेसाठी खरेदीबाबतचा पुरावा बाळगलेल्या गुळाबाबत.

**कायदा लागु असलेल्या गुळासदर्भातील अनुज्ञप्त्यांबाबत**

५. जे व्यापारी अखाद्य गुळाची विक्री करु इच्छितात तसेच खांड्सरीमधील मळी खरेदी व विक्री करु इच्छितात त्या व्यापाऱ्यांना संबंधित जिल्हयांच्या जिल्हाधिकाऱ्याकडुन मुंबई दारुबंदी कायद्याखालील मुंबई मळी नियम १९५५ अंतर्गत विहीत केल्यानुसार पुढीलप्रमाणे अनुज्ञप्ती प्राप्त करणे जरुरीचे आहे.

अ. मळी / अखाद्य गुळ उत्पादन व विक्री - एम-१ अनुज्ञप्ती.

ब. मळी / अखाद्य गुळ बाळगणे व वापरणे - एम-२ अनुज्ञप्ती.

क. मळी / अखाद्य गुळ बाळगणे व विक्री करणे - एम-३ अनुज्ञप्ती

ड. अखाद्य गुळाची परराज्यातुन आयात करणे किंवा परराज्यात निर्यात करणे अनुक्रमे एम-४ व एम-५ अनुज्ञप्ती.

इ. अखाद्य गुळाची महाराष्ट्रात अंतर्गत वहातुक करणे - एम-६.

**काळयागुळा संदर्भात करावयाच्या कार्यवाही संदर्भात**

६.(१) जर कोणा पोलीस / राज्य उत्पादन शुल्क अधिका-यांस एखाद्या व्यक्तीकडे मळीच्या व्याख्येमध्ये समाविष्ट होईल असा गुळ आढळला तर त्या अधिका-याने प्रथम खालील पैकी एका अधिकाऱ्या समवेत संबंधित व्यक्तीचा जागेवरच जबाब नोंदवावा.

अ. महसुल विभागाच्या नायब तहसीलदार व त्यावरील दर्जाचा अधिकारी.

किंवा

ब. अन्न व औषध प्रशासनाच्या निरीक्षक किंवा त्यावरील अधिकारी.

किंवा

क. कार्यवाही करणारा अधिकारी पोलीस विभागाचा असल्यास राज्य उत्पादन शुल्क विभागाचा दुय्यम निरीक्षक किंवा त्या वरील दर्जाचा अधिकारी

किंवा

ड. कार्यवाही करणारा अधिकारी राज्य उत्पादन शुल्क विभागाचाअसल्यास पोलीस विभागाचा दुय्यम निरीक्षक किंवा त्या वरील अधिकारी.

६(२) जर त्या व्यक्तीने जबाबामध्ये सांगितले की त्यांच्याकडे चांगला गुळच होता व काही कारणामुळे खराब व खाण्यास अयोग्य झाला आहे तर त्याप्रमाणे त्याव्यक्तीचा सविस्तर जबाब नोंदवावा व गुळ काळा होण्याची कारणे जबाबामध्ये नमुद करुन घ्यावीत. जबाब नोंदविताना सदर व्यक्ती जे काही स्पष्टीकरण व माहिती देईल ती त्यामध्ये नोंदवावी. हा गुळ त्या व्यक्तीने कोठून आणला होता या बाबत त्यांचेकडे काही खरेदीच्या पावत्या आहेत का हे विचारावे/ पडताळावे व सदर तपशिलाची जबाबामध्ये नोंद घ्यावी. त्यानंतर उपरोक्त दोन्ही अधिका-यांनी सदर साठा पंचनाम्याखाली ताब्यात घ्यावा, व सुरक्षित साठवणुकीसाठी सुपुर्तनाम्यावर सदर व्यक्तीच्या ताब्यात द्यावा, त्यांच्याकडे खरेदीच्या पावत्या असल्यास वा त्या संदर्भात इतर कागदपत्रे असल्यास ती ताब्यात घ्यावीत. ताब्यात घेतलेल्या मुद्देमालाचे वजन करावे. ज्यांच्याकडून ताब्यात घेतला त्यांच्या मते हे वजन किती आहे हे जबाबात व पंचनाम्यात नोंदवावे. पंचनाम्यामध्ये सदर व्यक्तीने चांगला गुळ खराब झाल्याबद्दल जे कारण सांगितले आहे ते नमुद करावे. सदर व्यक्तीने सदर गळ कोठन आणला या बाबत काय परावा दिला आहे / काय सांगितले आहे हे नमुद करावे. सदर साठा जागेवरच / सुरक्षीत ठिकाणी ठेवावा, जरुर भासल्यास संबंधीत व्यक्तीकडे सुर्पुद नाम्यावर पुढील सुचना देई पर्यत सुरक्षित ठेवण्यासाठी देण्यात यावा.

६(३) जबाब व पंचनामा यांच्या प्रती त्या व्यक्तीस जागेवरच देण्यात याव्यात.

७(१). त्याचवेळी नमुना ५ प्रतीत काढावा व नमुन्याबाबत पुढीलप्रमाणे कार्यवाही करावी.

७(२) एक नमुना संबंधित गुळ व्यापाऱ्यास द्यावा. कार्यवाही करणाऱ्या दोन्ही अधिकाऱ्याकडे प्रत्येकी एक नमुना व एक नमुना सोबत जोडलेल्या यादीतील कोणत्याही एका प्रयोगशाळेकडे तात्काळ परंतु उशिरात उशिरा नमुना काढल्या पासुन सुट्टया वगळुन दोन दिवसांत पाठविण्यात यावा. पाचवा नमुना तपास अधिकाऱ्याने स्वतःच्या ताब्यात ठेवावा व प्रयोगशाळेचा प्राथमिक विश्लेषण अहवाल संबंधित पदार्थ मळी असल्याबाबत आल्यास पुढे विहीत केल्यानुसार सदर नमुना न्याय वैज्ञानिक प्रयोगशाळेस पाठविण्यात यावा.

गुळाचे नमुने घेणे व पृथ:करण करण्याबाबत

७(३) तपास अधिकाऱ्याने प्रयोग शाळेकडे विश्लेषण अहवाल ७ दिवसांच्या आत प्राथम्याने उपलब्ध करुन देण्याबाबत पाठपुरावा करावा. या मध्ये विलंब होता कामा नये. आयुक्त कार्यालयाकडुनही सोबतच्या यादीतील सर्व प्रयोगशाळांना विश्लेषण अहवाल एक आठवडयात उपलब्ध करण्याची विनंती करण्यात आली आहे. सदर विश्लेषण अहवालानुसार पकडलेला पदार्थ मळीच्या व्याख्येमध्ये मोडत नसेल तर तो तात्काळ २४ तासाचे आंत संबंधित व्यक्तीस पंचनाम्याखाली मुक्त करुन द्यावा व गुळ सुरक्षित परत मिळाल्याची पोच प्राप्त करुन घ्यावी व त्याप्रमाणे त्याच वेळेस संबंधित पोलीस अधीक्षक/आयुक्त/अधीक्षक राज्य उत्पादन शुल्क यांना त्याबाबतचा लेखी अहवाल गुळ परत केल्याच्या पुराव्यासह पाठवावा.

७(४) उपरोक्त विश्लेषण अहवालानुसार गुळ मळीच्या व्याख्येनुसार असल्याचे आढळल्यास मळीचा पाचवा नमुना न्याय वैज्ञानिक प्रयोगशाळेस पूर्वीच्या प्रयोगशाळेच्या अहवालासह पाठवुन द्यावा व नमुन्याचे विश्लेषण प्राधान्याने करण्याची विनंती करावी. न्याय वैज्ञानिक प्रयोगशाळेचा अहवाल प्राप्त झाल्यानंतर व वर नियुक्त केलेल्या समितीची मान्यता घेऊनच दोषारोप पत्र न्यायालयात सादर करण्याबाबतची कार्यवाही करावी.

७(५) तपास अधिका-यांने साठा ताब्यात घेताना नोंदविलेल्या जबाबानुसार सदर गुळाची खरेदी / परराज्यातून आयात या बाबतच्या कागदपत्रांची जरुर ती चौकशी तातडीने पूर्ण करावी. जर तपासाअंती व प्राथमिक विश्लेषण अहवालावरुन ज्यांच्याकडून साठा ताब्यात घेतला त्या व्यक्तीकडून खाण्यास अयोग्य गुळ जाणूनबूजून बाळगला होता असे आढळले तर सदर व्यक्तींवर न्यायालयात दोषारोपपत्र दाखल करण्यापूर्वी वर नमुद केल्याप्रमाणे नमुन्याची एक प्रत न्याय व वैज्ञानिक प्रयोगशाळेस पाठवावी आणि तपास अधिका-यांने संबंधीत पोलीस अधीक्षक / आयुक्त / अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क यांच्या मार्फत संबंधित जिल्हाधिकारी यांच्याकडून खटला भरण्यासाठी परवानगी मागावी व त्यामध्ये सविस्तर करणे नमुद करावीत. जिल्हाधिका-यांना प्राप्त झालेल्या तपास अधिका-यांचा अहवालांची छाननी करण्यासाठी ~~खालील~~ वर नमुद प्रमाणे प्रत्येक जिल्हयात एक समिती नेमण्यात येत आहे. या ~~समितीचे खालील प्रमाणे सदस्य राहतील.~~ तीन सदस्य उपस्थित असल्यास कोरम पूर्ण राहील. या समितीच्या निष्कर्षावर जिल्हाधिकारी अंतिम निर्णय घेतील.

८. जिल्हाधिका-यांनी तपास अधिका-यांचा अहवाल प्राप्त झाल्यापासुन उशिरात उशीरा १५ दिवसांचे आत समितीची बैठक बोलाविणे आवश्यक राहील. बैठकीत समितीने जर असा निष्कर्ष काढला की ज्याच्याकडून सदर साठा ताब्यात घेण्यात आला होता त्या व्यक्तीने चूकीची माहिती दिली होती व खाण्यास योग्य गुळाच्या नावाखाली सदर व्यक्ती मळीचा व्यवहार करीत होती तर अशा प्रकरणी समितीच्या शिफारशीवर जिल्हाधिकारी योग्य तो निर्णय घेवून संबंधीत व्यक्तीवर खटला भरण्यास तपास अधिका-यांना परवानगी देतील. त्यानंतर तपास अधिकारी न्यायालयात दोषारोपपत्र दाखल करतील. जर समितीच्या शिफारशीनंतर जिल्हाधिका-यांना संबंधीत व्यक्तीने जाणुनबुजुन काही चुकीची कार्यवाही केली नाही असे आढळले तर न्यायालयात दोषारोपपत्र दाखल करण्यात येऊ नये अशा सूचना जिल्हाधिकारी तपास अधिका-यांना देतील व या साठी जरुर

तो अहवाल तपास अधिका-यांने संबंधीत फौजदारी न्यायालयास सादर करावा. मात्र अशी कार्यवाही केली तरी ताब्यात घेतलेला मळीचा साठा संबंधीत व्यक्तीस परत करता येणार नाही.

(९) जर विश्लेषण अहवालानुसार पकडलेला पदार्थ मळीच्या व्याख्येत मोडत असेल तर तो साठा शासनास जमा करण्यासाठी तपास अधिका-याने संबंधीत फौजदारी न्यायालयात १५ दिवसात अर्ज करावा. व त्यामध्ये विल्हेवाटीसाठी सदर साठा त्या जिल्हयाचे अधीक्षक राज्य उत्पादन शुल्क यांच्याकडे वर्ग करण्यास विनंती करावी. अधीक्षक राज्य उत्पादन शुल्क यांना न्यायालयाचे आदेश प्राप्त झाल्यावर सदर साठा Bombay Prohibition Confiscated or Forfeited Articles (Disposal) Regulations, १९५३चा नियम १०मधील तरतुदीनुसार मळीच्या आवश्यकतेबाबत प्रथम पश्चिम महाराष्ट्र विकास महामंडळाच्या चितळी आसवनीस विचारणा करावी व त्यांनी मळी उचलण्यास नकार दिल्यास त्यानंतर लिलावाव्दारे मुंबई मळी नियमावलीखाली मंजुर केलेल्या अनुज्ञप्तीधारकांना विकावी व मळीची विल्हेवाट वरील प्रमाणे लावता न आल्यास ती नाश करण्याबाबत जिल्हाधिकारी यांचे आदेश घ्यावेत. ५० किलो पेक्षा कमी साठा अधीक्षकांचे उपस्थितीत व त्यापेक्षा जास्त साठ्यासाठी संबधित विभागाचे तहसिलदार व पोलीस निरीक्षक यांच्या उपस्थितीत नष्ट केला जाईल.

(१०) ज्या वेळी मळीच्या व्याख्येमध्ये प्रथम दर्शनी समावेश होणारा खाण्यास अयोग्य गुळ मोठया प्रमाणावर आयात केल्याचे / बाळगल्याचे दिसून येईल व त्यासाठी मुंबई मद्य निषेध कायद्याखाली विहीत अनुज्ञप्ती, परवाना नसेल व संबंधीत व्यक्ती पोलीस / राज्य उत्पादन शुल्क अधिका-याकडे या बाबत प्रथम दर्शनी समाधानकारक खुलासा / कारण नोंदविलेल्या जबाबामध्ये देऊ शकली नाही तर अशा प्रकरणी संबंधीत व्यक्तीस अटक करण्यासाठी जिल्हाधिकारी यांची पूर्वपरवानगी घेण्याची जरुरी नाही. मात्र या बाबत माहिती देणारे तात्काळ

अहवाल सादर करण्यात यावेत व त्यासोबत नोंदविलेल्या जबाबाची प्रत देखील सादर करावी.

(११) प्रकरणी आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क यांनी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे .

सोबत प्राथमिक विश्लेषण अहवालासाठी नमुने पाठवावयाच्या प्रयोगशाळांची नांवे व पत्ते जोडले आहेत.

( वाय. टी. पाडवी )
कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) आयुक्त राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य , मुंबई.
२) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) आयुक्त, अन्न व औषधी प्रशासन, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) संचालक न्याय वैज्ञानिक प्रयोग शाळा, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) सर्व जिल्हाधिकारी.
६) सर्व पोलीस अधीक्षक / आयुक्त.
७) सर्व अधीक्षक /विभागीय उपायुक्त, राज्य उत्पादन शुल्क.
८) उप संचालक, प्रादेशिक न्याय वैज्ञानिक प्रयोगशाळा, मुंबई, पुणे, औरंगाबाद, नागपूर.
९) दि.पुना मर्चंट , पुणे व्यापार भवन,मार्केट यार्ड, गुळटेकडी, पुणे.
१०) सर्व सभापती, कृषी उत्पन्न बाजार समिती.
११) संचालक सार्वजनिक आरोग्य विभाग
१२) व्यवस्थापक, पश्चिम महाराष्ट्र विकास महामंडळ, चितळी, ता.श्रीरामपूर, जि.अहमदनगर.
१३) व्यवस्थापकीय संचालक, पश्चिम महाराष्ट्र विकास महामंडळ, पुणे.

अधीक्षकांनी जिल्हा गुळ व्यापारी संघटना व सभापती कृषी उत्पन्न बाजार समिती यांच्याशी लेखी संपर्क साधुन समितीवर नियुक्त करावयाच्या प्रतिनिधींची नांवे प्राप्त करुन घ्यावीत व जिल्हाधिकाऱ्यांच्या स्वाक्षरीने समिती नियुक्त करावी.

List showing the Food Samles Testing Laboratories situated in Maharashtra under the control of Public Health Department, Mantralaya.

********

1. Deputy Director of Health Services I/c. State Public Health Laboratory, Water works compund, Starvey Road, Pune- 411 001.

2. Public Analyst, Brihan Mumbai Mahanagarpalika, G-North Ward Office, Opposite Shivaji Mandir, Dadar, Mumbai- 400 028.

3. Chief Chemist, District Public Health Laboratory, Nursing Hostel, Irwin Chowk, Amravati.

4. Office-in-charge Regional Public Health Laboratory, Near N.A.D.T.office, Nagpur-2.

5. Jr.Scientific Officer,District Public Health Laboratory, Nasik.

6. Chief Chemist, District Public Health Laboratory, Jalgaon 425 001.

7. Chief Chemist, District Public Health Laboratory, 120-Shri Shahu Market Yard, Kolhapur 416 005.

8. Jr.Scientific Officer, District Public Health Laboratory, Nanded.

9. Jr.Scientific Officer, District Public Health Laboratory, Sangli.

10. In-charge, District Public Health Laboratory, Auangabad.

11. Chief Analytical Chemist, District Public Health Laboratory, Solapur.

12. Chief Chemist, District Public Health Laboratory, Osmanabad.

13. Jr.Scientific Chemist, District Public Health Laboratory, Konkan Bhavan, Navi Mumbai.

*********